आत्मानात्मविचार सदैव जागृत आहे व जो ऐहिक व पारलौकिक भोगांविषयी पूर्णपणें विरक्त असून शमादिषट्संपत्तीनें संपन्न आहे, व ज्यास मोक्षेच्छा असून, 'मी कोण आहे' हें जाणण्याची अत्युत्कट उत्कंठा व तीव्र लालसा आहे, त्यास **प्रथम** वर्गांतील ज्ञानी म्हणावें. जो उपनिषदांनीं प्रतिपाद्यपुरुष जाणण्याकरितां, जीव ब्रह्माच्या एकतेचा निश्चय करण्याकरितां, श्रुत्युपदिष्ट मार्गानें विधिवत् समिधादि उपहार घेऊन, शब्दपारंगत, परनिष्णात, ब्रह्मनिष्ठ व श्रोत्रीय ब्राह्मण सद्गुरूस शरण येऊन, नमस्कारपूर्वक नम्रतेनें त्यांच्याशी प्रश्नोत्तरें करितो, व कायिक, वाचिक, मानसिक सेवेनें त्यांस संतुष्ट करून, त्यांच्याकडून आपल्या शंकांचें समाधान करून घेतो, व जीवब्रह्मऐक्यसाधक व भेदबाधक अशा वेदांतवाक्यांची वाटाघाट करून उपनिषद्वाक्यांचें तात्पर्य कशांत आहे हें समजावून घेतो व ऐक्यतानिश्चयरूप श्रवण करितो व श्रवण केलेल्या वाक्यांचा व श्रुतितात्पर्याचा व श्रीगुरूंनी ठसविलेल्या अनुभवाचा दृढ निश्चय होण्याकरितां वारंवार सांगितलेल्या व नवीन युक्त्यांचे जो सारखे मनन करितो, तो **दुसऱ्या** वर्गांतील ज्ञानी समजावा. ज्यास मी असत्‌जडदुःखरूपादिअनात्मरूप नसून पंचकोशातीत सच्चिदानंदस्वरूप ब्रह्म आहे, असा(अदृढ) अपरोक्षानुभव असून, जो श्रवणमननद्वारा निर्णित जीवब्रह्मैक्यतेच्या निश्चयाच्या निदिध्यासनांत निमग्न असतो, व त्या योगानें ज्याचें स्वाभाविक बहिर्मुखअसलेलें उच्छृंखल मन अंतर्मुख झालेलें असतें, तो ज्ञान्यांचा **तिसरा** वर्ग होय. श्रवण, मनन व निदिध्यासनानें, संशय व विपर्ययरहित स्वरूपसाक्षात्काररूप निर्विकल्प स्थिती ज्यास प्राप्त होते, व त्या योगानें आधीच शुद्ध व स्थिर असलेलें ज्याचें अंतःकरण तत्वज्ञानानें परिपूर्ण होतें, त्या ज्ञान्याची गणना **चवथ्या** वर्गांत करावी. जीवब्रह्माची ऐक्यता श्रवण केली, व ती अंतःकरणांत बिंबली, व नंतर तिचें यथोचित मनन व निदिध्यासनही झालें, म्हणजे निदिध्यासनाची परिपक्कतारूप समाधिअवस्था प्राप्त होते; त्यांत कनिष्ट सविकल्प ओलांडून, श्रेष्ठ अशा निर्विकल्पसमाधीपदावर जो आरूढ होतो, व ज्याची देहाचे ठिकाणीं असलेली अहंता, व देहसंबंधींच्या ठिकाणीं

असलेली ममता नाहींशीं होते, व मी देही आहे, अशा प्रकारचा अभिमान चुकूनही ज्याच्या अंतःकरणांत उद्भवत नाहीं, म्हणजे देहादिअनात्मपदार्थांच्या आसक्तीचा जेथें अभाव असतो, त्यास **पांचव्या** प्रतीच्या ज्ञान्यांत बसवावें. निर्विकल्पसमाधीच्या पूर्ण व उत्तम अभ्यासानें, देहादिक सर्व अनात्मपदार्थांची अधिष्ठान ब्रह्मरूपानें प्रतीती होऊन, अनात्मपदार्थांची जी अप्रतीती होते, त्यास **पदार्थाभाविनी** असें म्हणतात. अशी ज्याची अवस्था असेल तो **सहाव्या** वर्गांतील ज्ञानी होय. ज्ञाता, ज्ञान व ज्ञेय अशी त्रिपुटी, चतुर्थ व पंचमवर्गांतील ज्ञानावस्थांत भावरूपानें भासते, तिचाहि जेथें उदय नाहीं, व षष्ठावस्थेंतील ज्ञान्यास ही त्रिपुटी अभावरूपानें प्रतीत होत असते, त्या प्रतीतीचाही जेथें पूर्णपणें अभाव असतो, म्हणजे त्रिपुटीच्या प्रतीतीच्या ( भानाच्या ) भावाचा व अभावाचा अनुदय असतो, व अंतःकरणाची त्रिपुटीच्या पलीकडे तुरीय ( चतुर्थ ) पदाचें ठिकाणीं जी स्थिती होते, त्या अवस्थेंस **तुरीयगा** असें म्हणतात. हाच ज्ञान्यांचा मुगुटमणी असा **सातवा** वर्ग होय. ह्या सर्व अवस्था उत्तरोत्तर तत्वज्ञानवर्धक आहेत. शुभेच्छा, सुविचारिणा व तनुमानसा ह्यांची साधनांत गणना असल्यामुळें, तदवस्थावानांची गणना शास्त्रकार सिद्धांमध्यें न करितां, साधकांत करितात. सत्वापत्ती तत्वज्ञानरूपच असल्यानें, ती कैवल्याचें साधन आहे. ह्या अवस्थेवर पूर्णपणें आरूढ झालेल्यास **ज्ञानी** म्हणण्याचा आरंभ करावा पाहिजे तर! सत्वापत्तिअवस्थेचे अधिकारी दोन आहेत. एक ज्ञानपूर्वकालीं उपासना केलेला व दुसरा न केलेला. कृतोपासन जो आहे, तो लवकरच असंसक्तिवर्गांत चढतो, व वैराग्यादि साधनें त्याच्या ठिकाणीं भरभराटींत असतात, व तसें दिसतेंही; परंतु अकृतोपासकाचें ठिकाणीं सर्व साधनें प्रतीत होत नाहीं, तरी एखादें दुसरें तरी प्रकट असतेंच. मात्र अप्रकट साधनांचा अभाव असतो, असें मात्र नव्हे; तीं तेथें गुप्त असतातच. ह्यास्तव तो ज्ञानी जर असाधरण बुद्धिमान् असेल, तर तो तत्वज्ञानाच्या चतुर्थभूमिकेचा स्वामी लवकर होतो, व तसा नसेल तर तो बऱ्याच अवधीनें आपला मुक्काम ( चवथी भूमिका ) गांठतो;

मात्र आरूढपतीत होत नाहीं. बाकीच्या तीन अवस्था जीवन्मुक्ताचा निरतिशय आनंद कायम ठेवण्यास साधनीभूत आहेत. ह्या अवस्थांतील ज्ञानी मात्र सिद्ध म्हणवून घेण्यास योग्य आहे; किंबहुना त्यास तसें म्हणवून घेण्याचा सर्वतोपरी हक्क आहे. ह्या कसोट्या हातांत असून त्यांचा उपयोग कसा करावा, ह्याची ज्यास पूर्ण माहिती असेल, तो सोन्याची ( साधूची ) परीक्षा उत्तम रीतीनें करूं शकेल व सोनें नसून एकादी हिणकट धातू ( भोंदू ) असल्यास तसेंही स्पष्ट सांगूं शकेल.

**कः खलु नालंक्रियते दृष्टाऽदृष्टार्थ साधन पटीयान् ।**
**अनया कण्ठस्थितया प्रश्नोत्तररत्नमालिकया ॥ १ ॥**

श्रीमच्छंकराचार्यपादाः